नागपूर मध्यवर्ती कारागृह येथील पाणीपुरवठा व मलनि:सारण व्यवस्थेमध्ये सुधारणा करण्यासाठी होणाऱ्या खर्चास प्रशासकीय मंजुरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
गृह विभाग
शासन निर्णय क्र. बीएलडी ३४२०/१/(१९)/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-३२, दि. २० फेब्रुवारी, २००४

पहा :- १) कारागृह उप महानिरिक्षक , महाराष्ट्र राज्य, यांचे पत्र क्र. बीएलडी/३५२१/५७७/कक्ष-३ पुणे-१, दि. २३.१२.१९९९
२) मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांनी याचिका क्रमांक २८५/१९९९ बाबत, दि. ३.११.१९९९ रोजी दिलेला आदेश

<u>शासन निर्णय</u> :- नागपूर मध्यवर्ती कारागृह येथील पाणीपुरवठा व मलनि:सारा व्यवस्थेमध्ये सुधारणा करण्यासाठी येणाऱ्या रुपये ३,३१,२९,०००/- इतक्या रकमेच्या खर्चाच्या अंदाजपत्रक व नकाशास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. कारागृहातील बंद्यांना सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत बंदी श्री. सखाराम जयभाये यांनी मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे रिट याचिका क्रमांक २८५/९९ सादर केली होती. त्यावर मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांनी बंद्यांना सोयी सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत त्यांच्या उपरोक्त दि. ३.११.१९९९ रोजी दिलेल्या आदेशामध्ये बंद्यांच्या आरोग्याच्या दृष्टीने नागपूर मध्यवर्ती कारागृहातील पाणीपुरवठा पाईपलाईन व मलनि:सारण व्यवस्थेमध्ये सुधारणा करण्याबाबत आयुक्त, नागपूर महानगरपालिका मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्यकारी अभियंता (इमारती), सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर व राज्य शासनास सूचना दिलेल्या आहेत. त्यानुषंगाने कारागृह उप महानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांचे वरील दि. २३.१२.९९ च्या पत्रान्वये नागपूर मध्यवर्ती कारागृह येथील पाणीपुरवठा व मलनि:सारण व्यवस्थेमध्ये सुधारणा करण्यासाठी येणारा खर्च रु. ३,३१,२९,०००/- चा प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेसाठी पाठविला आहे.

नागपूर मध्यवर्ती कारागृहातील पाणीपुरवठा व मलनि:सारण व्यवस्थेमध्ये दुरुस्ती या कामाचा समावेश केंद्रपुरस्कृत कारागृह सुधारणा या योजनेतर योजनेच्या आराखड्यात करण्यात आला असून, उपरोक्त वस्तुस्थिती, कामाची निकड व त्यामुळे

बंद्यांना जीवनावश्यक व अत्यावश्यक असलेल्या सुविधेतील होणारी वाढ, तसेच बंद्यांना सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत न्यायालयीन आदेश या बाबींचा काळजीपूर्वक विचार करुन शासन या कामासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने पाठविलेल्या रु. ३,३१,२९,०००/- (रुपये तीन कोटी एकतीस लाख एकोणतीस हजार फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रक व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता देत आहे.

यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशीर्ष "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००) (०२) कारागृह सुधारणा योजना (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर) (दत्तमत) (२०५६-०१८-२)" या लेखाशिर्षाखाली सन 2003-२००४ च्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा, व खर्चाची माहिती विहित प्रपत्रामध्ये शासनास पाठविण्यात यावी.

हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर ५९/२००४/व्यय-८, दि. ३.२.२००४ अन्वये दिलेल्या मंजुरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(र. ना. माळी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत

- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक, नागपूर मध्यवर्ती कारागृह, नागपूर.
- मुख्य अभियंता, महाराष्ट्र जिवन प्राधिकरण विभाग, नागपूर.
- मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
- कार्यकारी अभियंता (इमारती), सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
- जिल्हाधिकारी, नागपूर.
- आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व परिक्षा) मुंबई / नागपूर.
- जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
- सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
- वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई-३२.
- अवर सचिव (पीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती, पीआरएस-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.